आदिवासी विकास विभागांतर्गत शासकीय आश्रमशाळा/ वसतिगृहे यांच्या बांधकाम व देखभालीकरीता सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गतचे विभाग/ उपविभाग आदिवासी विकास विभागाकडे समर्पित करण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. ईएसटी २०१६/प्र.क्र.६२/प्रशासन-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : ११ नोव्हेंबर, २०१६

**संदर्भ :** १) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.शाआशा २०१५/प्र.क्र.९८/ का-१३, दिनांक १४.७.२०१६

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यात आदिवासी विकास विभागांतर्गत एकूण ५२९ शासकीय आश्रमशाळा व ४९१ शासकीय वसतिगृहे कार्यरत आहेत. सद्य:स्थितीत २०६ आश्रमशाळा व ५४ वसतिगृहाच्या इमारतींचे बांधकाम सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत सुरु आहे. सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत इतर विभागाप्रमाणेच शासकीय आश्रमशाळा व वसतिगृह इमारत बांधकामे व देखभाल दुरुस्त्या करण्यात येतात. परंतु बांधकामाचे प्राकलने तयार करणे, तांत्रिक मान्यता देणे, निविदा मागविणे व प्रत्यक्ष बांधकाम करणे तातडीने होवून वसतिगृहामधील विद्यार्थ्यांना मुलभुत सुविधांपासून वंचित रहावे लागू नये याकरीता शासकीय आश्रमशाळा/ वसतिगृहांची बांधकामे व देखभाल दुरुस्तीच्या कामाचे संनियंत्रण करण्यासाठी आदिवासी विकास विभागांतर्गत स्वतंत्र -बांधकाम व्यवस्थापन कक्ष॰ स्थापन करण्याच्या प्रस्तावास मंत्रिमंडळाने मान्यता दिलेली आहे. त्यानुसार आदिवासी उपयोजनेमधील आदिवासी आश्रमशाळा व वसतिगृहाच्या बांधकामासाठी सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिपत्याखालील काही सा.बां.विभाग व उपविभाग समर्पित स्वरुपात जोडण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासकीय आश्रमशाळा व वसतिगृहाच्या बांधकामासाठी व वसतिगृहाची बांधकामे व देखभाल व दुरुस्तीसाठी शासन निर्णय आदिवासी विकास विभाग दि. १४.७.२०१६ अन्वये स्वतंत्र -बांधकाम व्यवस्थापन कक्ष॰ स्थापन करण्यात आलेला असून यासाठी मुख्य अभियंता यांचे १ पद व अधीक्षक अभियंता यांचे नाशिक व नागपूर येथे प्रत्येकी १ प्रमाणे २ पदे व अन्य १८ पदांच्या पदनिर्मितीस मान्यता देण्यात आलेली आहे. आदिवासी विभागांतर्गत आश्रमशाळा व वसतिगृहाची कामे प्राथम्याने पूर्ण करण्याच्या अनुषंगाने सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिपत्याखालील कार्यरत कार्यकारी अभियंता यांच्या संनियंत्रणामधील सार्वजनिक बांधकाम विभाग (P.W.Division) व उपविभाग (P.W.Sub-Divisions) समर्पित स्वरुपात (Dedicated) जोडणे आवश्यक आहे. त्या अनुषंगाने राज्यातील एकूण कार्यरत विभाग व उपविभागाचा आढावा घेवून आदिवासी विकास विभागांतर्गत स्थापन करण्यात आलेल्या नागपूर व नाशिक येथील मंडळ कार्यालयांसाठी खालील सार्वजनिक बांधकाम विभाग व उपविभाग समर्पित स्वरुपात जोडण्यात येत आहेत.

| अ.क्र. | | सध्याच्या विभागाची व उपविभागाची नांवे (*जुने नांव कंसात दर्शविले आहे.) | मुख्यालय | प्रस्तावित कार्यक्षेत्र |
|---|---|---|---|---|
| *अ* | | **अधीक्षक अभियंता, सा.बां. (आदिवासी) मंडळ नाशिक** | नाशिक | नाशिक, पुणे व कोकण प्रादेशिक विभागातील आदिवासी क्षेत्र |
| | १ | **सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) विभाग, धुळे** (*मार्ग प्रकल्प विभाग, धुळे) | धुळे | नाशिक, धुळे , जळगांव, अहमदनगर, नंदुरबार, पुणे जिल्हे |
| | i) | **सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग नाशिक** (*मार्ग प्रकल्प उपविभाग क्र.३, नाशिक) | नाशिक | नाशिक, सिन्नर, येवला, निफाड, इगतपुरी, दिंडोरी, पेठ, त्र्यंबकेश्वर |
| | ii) | **सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग, कळवण** (*मार्ग प्रकल्प उपविभाग क्र.१,धुळे) | कळवण | कळवण, सुरगाणा मालेगाव, चांदवड, नांदगांव, देवळा, बागलाण |
| | iii) | **सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग, तळोदा** (*मार्ग प्रकल्प उपविभाग, शहादा) | शहादा | अक्राणी, अक्कलकुवा, तळोदा, धडगाव |
| | iv) | **सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग, धुळे** (दुष्काळी प्रकल्प उपविभाग, धुळे) | धुळे | धुळे, साक्री, शिरपूर, सिंदखेडा व जळगांव जिल्हा |
| | v) | **सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग, नंदुरबार** (*मार्ग प्रकल्प उपविभाग, नंदुरबार) | नंदूरबार | नंदुरबार, शहादा, नवापुर |
| | vi) | **सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग, संगमनेर** (*मार्ग प्रकल्प उपविभाग क्र.८ संगमनेर) | संगमनेर | पुणे व अहमदनगर जिल्हा |
| | २ | **सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) विभाग, ठाणे** (*मार्ग प्रकल्प विभाग, कोकण भवन) | कोकण भवन | ठाणे, पालघर व रायगड जिल्हा |
| | i) | **सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग शहापूर** (*मार्ग प्रकल्प उपविभाग क्र. १, ठाणे) | शहापूर | ठाणे, अंबरनाथ, शहापूर, मुरबाड, कल्याण, भिवंडी, मुंबई व मुंबई उपनगर, रायगड जिल्हे |
| | ii) | **सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग डहाणू** (*मार्ग प्रकल्प उपविभाग क्र.२, ठाणे) | डहाणू | पालघर, डहाणू, तलासरी, वसई |
| | iii) | **सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग, जव्हार** (*पूल पाहणी उपविभाग क्र.५, कोकण भवन) | जव्हार | जव्हार,वाडा, मोखाडा, विक्रमगड |
| *ब* | | ***अधीक्षक अभियंता, सा.बां.* (आदिवासी) मंडळ, *नागपूर*** | नागपूर | नागपूर, अमरावती, औरंगाबाद प्रादेशिक विभागातील आदिवासी क्षेत्र |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | १ | <u>**सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) विभाग, चंद्रपूर**</u><br>(*मार्ग प्रकल्प विभाग, चंद्रपूर) | चंद्रपूर | नागपूर, चंद्रपूर, भंडारा, गडचिरोली, गोंदिया, वर्धा जिल्हे |
| | i) | **सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग, नागपूर**<br>(*सार्वजनिक बांधकाम उपविभाग क्र.३ भंडाराचे स्थानांतरण) | नागपूर | नागपूर, उमरेड, सावनेर, रामटेक, हिंगणा,वर्धा<br>देवरी, सडक अर्जुनी, तिरोडा, सालेकसा,आमगाव<br>भंडारा, तुमसर, साकोली, लाखनी, मोहाडी |
| | ii) | **सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग, गडचिरोली**<br>(*सार्वजनिक बांधकाम उपविभाग क्र.२ गडचिरोली -- मूळ मार्ग प्रकल्प उपविभाग गडचिरोली--सा.बां. विभाग क्र.१ गडचिरोली अंतर्गतचे) | गडचिरोली | गडचिरोली, वडसा, आरमोरी, कुरखेडा, धानोरा, चार्मोशी, कोरची |
| | iii) | **सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग,आलापल्ली**<br>(*विशेष प्रकल्प उपविभाग क्र.२ सिरोंचा - विशेष प्रकल्प विभाग सिरोंचा अंतर्गतचे स्थानांतरण) | आलापल्ली | अहेरी, सिरोंचा, मुलचेरा<br>भामरागड, एटापल्ली |
| | iv) | **सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग, चंद्रपूर**<br>(*मार्ग प्रकल्प उपविभाग क्र.१ चंद्रपूर– मार्ग प्रकल्प विभाग चंद्रपूर अंतर्गतचे स्थानांतरण) | चंद्रपूर | चंद्रपूर, राजुरा, कोरपना, मुल, सावली, सिंदेवाही, गोंडपिंपरी, बल्लारपुर, पोंभुर्णा, जिवती, गडचांदुर<br>चिमुर, वरोरा, भद्रावती, नागभीड, ब्रम्हपुरी |
| | २ | <u>**सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) विभाग, अमरावती**</u><br>(*सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.२ अमरावती) | अमरावती | अमरावती, अकोला, बुलढाणा, वाशिम, यवतमाळ, हिंगोली, नांदेड जिल्हे |
| | i) | **सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग,धारणी**<br>(*सार्वजनिक बांधकाम उपविभाग क्र.२ धारणी) | धारणी | अमरावती, धारणी, चिखलदरा, मोर्शी, तिवसा, वरुड<br>अकोला, वाशिम व बुलढाणा जिल्हे |
| | ii) | **सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग, झरीजामणी**<br>(*सार्वजनिक बांधकाम उपविभाग, झरी जामणी) | झरीजामणी | उमरखेड, महागांव, नेर, पुसद, दारव्हा, दिग्रस, आर्णी मारेगाव, यवतमाळ, कळंब, राळेगांव, बाभुळगांव, केळापुर, घाटंजी, वणी, झरीजामणी |
| | iii) | **सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) उपविभाग, किनवट**<br>(*सा.बां.उपविभाग क्र.२, किनवट) | किनवट | किनवट, बिलोली, मुखेड, मुदखेड, माहुर, भोकर, उमरी तसेच हिंगोली व परभणी जिल्हे |

२. सांगली, सातारा, कोल्हापुर, सोलापूर, रत्नागिरी, सिंधुदुर्ग, उस्मानाबाद, औरंगाबाद, जालना, बीड व लातूर या जिल्हयातील आदिवासी क्षेत्र व कामे ही विखुरलेल्या स्वरुपात व तुलनात्मक अत्यल्प असल्याने सदर कामे कोणत्या विभाग / उपविभागाकडे सोपवावी, याबाबत आदिवासी विकास विभाग निर्णय घेईल.

३. ज्या उपविभागांकडे कार्यालये उपलब्ध नसतील त्या उपविभागांसाठी कार्यालय उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही संबंधित प्रकल्प अधिकारी यांची असेल. त्यांनी त्यांच्या कार्यालयाच्या इमारतीत सार्वजनिक बांधकाम आदिवासी उपविभागासाठी जागा उपलब्ध करुन द्यावी. अथवा भाडेपट्टयाने कार्यालये उपलब्ध करुन द्यावीत व भाडेपट्टी ही संबंधित प्रकल्प अधिकाऱ्यांनी अदा करावी,

४. उपरोक्तप्रमाणे पुनर्रचना करुन आदिवासी विकास विभागाकडे विभाग-उपविभाग वर्ग केल्यानंतर उपरोक्त सर्व विभाग/ उपविभागामधील कार्यरत अधिकारी/कर्मचारी यांच्या आस्थापनाविषयक बाबी सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संबंधित परिमंडळ कार्यालयाकडून हाताळण्यात येतील. तसेच उपरोक्त नमूद केल्यानुसार कार्यकारी अभियंता यांचे नियंत्रणाखालील पुनर्रचनेप्रमाणे बांधकाम विभाग व उपविभाग कार्यालयांतर्गत अधिकारी /कर्मचाऱ्यांचा वेतनावरील खर्च पूर्वीप्रमाणेच सार्वजनिक बांधकाम विभागाकडून मंजूर लेखाशिर्षाखालील तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय हा आदिवासी विकास विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय **दिनांक १ डिसेंबर, २०१६** पासून अंमलात येईल. तत्पूर्वी उपरोक्त तक्त्यातील विभाग / उपविभागांनी सार्वजनिक बांधकाम विभागासंबंधित दस्तऐवज संबंधित सार्वजनिक बांधकाम मंडळाकडे हस्तांतरित करावा.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६११०३१७०२४८९४१८ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Archana Vilas Walzade

Digitally signed by Archana Vilas Walzade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Archana Vilas Walzade
Date: 2016.11.11 16:52:53 +05'30'

(अ.वि. वालझाडे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मंत्री, (सार्वजनिक बांधकाम)यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री, (सार्वजनिक बांधकाम)यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव (सार्वजनिक बांधकाम ) मंत्रालय, मुंबई
४. सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
५. सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
६. सचिव,आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२
७. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,
८. मुख्य अभियंता, आदिवासी बांधकाम कक्ष
९. सर्व सहसचिव, उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सार्वजनिक बांधकाम विभाग.
११. सर्व अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय ,मुंबई
१२. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१३. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य ,मुंबई/नागपूर

१४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
१५. अधिदान व लेखा अधिकारी, वान्द्रे (पूर्व), मुंबई
१६. सर्व कक्ष अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. कार्यासन प्रशासन-१,सार्वजनिक बांधकाम विभाग (निवड नस्ती).